नंदुरबार जिल्हयात तोरणमाळ, ता.अक्राणी येथे नवीन ३३ /११ के.व्ही. उपकेंद्र स्थापन करण्यास आदिवासी उपयोजनेतून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३ /प्र.क्र.१२४ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३

<u>संदर्भ</u> : महावितरण कंपनीचे पत्र क्र. ३२७१, दि.०७.०२.२०२३

**<u>प्रस्तावना:</u>**

नंदुरबार जिल्ह्यातील अक्राणी तालुक्यातील तोरणमाळ येथील परिसरात कमी विद्युत दाबाने वीज पुरवठा होत असल्याने या ठिकाणी ३३/११ के.व्ही. चे नवीन उपकेंद्र उभारणे आवश्यक आहे. सद्यस्थितीत तोरणमाळ परिसराकरिता ३३/११ के.व्ही. इस्लामपूर या उपकेंद्रातून निघणाऱ्या ११ के.व्ही इस्लामपूर गावठाण फिडरद्वारे वीजपुरवठा करण्यात येतो. या ११ के.व्ही. विद्युत वाहिनीची लांबी ६५ कि.मी. इतकी आहे. त्यामुळे सदर परिसरातील ग्राहकांना कमी विद्युत दाब व वारंवार वीजपुरवठा खंडीत होणे या समस्यांना तोंड द्यावे लागते. तोरणमाळ हे सातपुडा पर्वत रांगेतील एक प्रसिध्द थंड हवेचे ठिकाण आहे.

तोरणमाळ येथे नवीन उपकेंद्र उभारल्यास कार्यरत इस्लामपूर उपकेंद्रावरील भार ०.६१ MVA ने कमी होणार आहे. तसेच योग्य दाबाचा वीज पुरवठा होणार आहे. तसेच वीजपुरवठा खंडीत होण्याचे प्रमाण कमी होणार आहे.

२. नंदुरबार जिल्हयात तोरणमाळ ता. अक्राणी येथे ३३/११ के.व्ही. नवीन उपकेंद्र स्थापन करण्यास आदिवासी विकास विभागाच्या राज्यस्तरीय योजनेतून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हाधिकारी, नंदुरबार यांनी आदिवासी विकास विभागास विनंती केली आहे.

३. सदर प्रस्तावित उपकेंद्राची क्षमता १ X ५ एमव्हीए इतकी असून सदर नवीन उपकेंद्रासाठी एकूण रुपये १०.९१ कोटी इतक्या निधीची आवश्यकता आहे. सदर रक्कम सन २०२२-२३ च्या महावितरण कंपनीच्या दरसूची (Cost-Data) नुसार घेण्यात आलेली आहे. संदर्भिय पत्रान्वये महावितरण कंपनीने सदर प्रस्तावास तांत्रिक मान्यता दिली असून निधी उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. नंदूरबार जिल्हा हा आदिवासी जिल्हा असल्याने तोरणमाळ ता. अक्राणी येथे ३३/११ के.व्ही. नवीन उपकेंद्र स्थापन करण्यासाठी लागणारा रुपये १०.९१ कोटी इतका निधी आदिवासी विकास विभागामार्फत उपलब्ध करून देण्याचे प्रस्तावित आहे.

उपरोक्त बाबी लक्षात घेता नंदुरबार जिल्हयांतील तोरणमाळ ता. अक्राणी येथे आदिवासी उपयोजने अंतर्गत नवीन उपकेंद्र उभारण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. नंदुरबार जिल्हयातील तोरणमाळ ता. अक्राणी येथे ३३/११ केव्ही, १x५ एमव्हीए क्षमतेचे नवीन वीज उपकेंद्र उभारण्याकरिता रुपये १०.९१ कोटी इतका निधी आदिवासी विकास विभागाकडून आदिवासी उपयोजने अंतर्गत उपलब्ध करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेसाठी होणारा खर्च मंजूर व अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीनूसार पुढील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक टी - ५
२८०१, वीज
८०, सर्वसाधारण, ७९६, जनजाती क्षेत्र योजना
(०२) जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण (२८०१ ५०८९)
कंपनी मर्यादित यांना अनुदान
(राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम)
३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान

३. सदर योजना राबविताना ऊर्जा विभागांतर्गत संबंधित क्षेत्रिय कार्यालयाने आदिवासी विकास विभागाचे संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेशी समन्वय साधावा. तसेच प्रकल्प अंमलबजावणी योग्य रितीने होईल तसेच अपेक्षित ध्येय प्राप्त होईल याची संपूर्ण जबाबदारी महावितरण कंपनीने पार पाडावी.

४. हा शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौ.संदर्भ क्र. ४११ दिनांक १५/०२/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०२२११६०५०३५५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT
PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2023.02.21 16:12:20 +05'30'

**(प्रशांत पुं.बडगेरी)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे प्रधान सचिव

४. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव

५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई.

६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. सर्व मंत्रालयीन विभाग

९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.

१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नंदुरबार.

११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.

१२.महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई

१३.कोषागार अधिकारी, जिल्हा नंदुरबार.

१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१५.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

१६.अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७.कक्ष अधिकारी (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८.कार्यासन अधिकारी (का-३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९.निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

20. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.